महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळास हातमाग विणकर सहकारी संस्थांना अदा करावयाच्या रक्कमेपोटी कर्ज स्वरूपात निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध करून देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हातमाग-२०२४/प्र.क्र.४८/टेक्स ३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई -४०००३२**
**दिनांक :- २८ मार्च २०२५**

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. संकीर्ण २०१५/प्र. क्र. २१/ टेक्स-३, दिनांक २६ मे, २०१५.

२) संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्र. कार्या-२(१) / ब-७१६/६१८६/२०१६, दिनांक २३ जून, २०१६.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पूरक-२०१६/ प्र. क्र. २०१/ अर्थसंकल्प-३, दिनांक ४ जानेवारी,२०१७.

४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः पुरक-२०१६/ प्र.क्र. ७३/२०१६/१७-स, दिनांक ६ जानेवारी, २०१७.

५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. संकीर्ण २०१६/प्र. क्र. ७२/ टेक्स-३, दिनांक २७ मार्च,२०१७.

६)आयुक्त,वस्त्रोद्योग आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र.कार्या २(१)/हातमाग/ब-६६०/४४४२/२०२४ ,दि.०७.०५.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

कोव्हीड-१९ च्या कालावधीत हातमाग महामंडळाची विक्री केंद्र, तसेच प्रदर्शनी आयोजित करणे इत्यादी कामे बंद होती. त्यामुळे हातमागावरील उत्पादीत मालाची विक्री पुर्णपणे ठप्प झाली होती. विणकरांना नियमित सुताचा पुरवठा व मजुरी देवून उत्पादन घेण्याचे काम सतत सुरु होते. महामंडळाकडे वर्कींग कॅपीटल कमी असल्यामुळे उत्पादन प्रक्रीयेकरिता शासकीय कार्यालयाला पुरवठा केलेल्या मालाची प्राप्त झालेल्या रक्कमेचा वापर करण्यात आला.शासकीय कार्यालयाला पुरवठा करण्यासाठी हातमाग विणकर सहकारी संस्थेकडून मालाची खरेदी करुन पुरवठा करण्यात आला होता. हातमाग महामंडळाची आर्थिक परिस्थिती अडचणीची असल्यामुळे हातमाग संस्थेकडून खरेदी केलेल्या मालाची रक्कम व जी. एस. टी. टी. डी. एस., इन्कम टॅक्स टी. डी. एस., ची शासकीय कार्यालयाने कपात केलेली रक्कम महामंडळाने हातमाग विणकर सहकारी संस्थेला आजतागायत अदा केलेली नाही. हातमाग विणकर सहकारी संस्था ही रक्कम प्राप्त होवून मिळण्यास सतत पाठपुरावा करीत आहे. हातमाग महामंडळाने सदर रक्कम खर्च केल्यामुळे हातमाग संस्थांना व्यवहार करण्यास अडचण निर्माण झाली आहे. वरील उद्भवलेल्या परिस्थितीचा विचार करून हातमाग महामंडळाला कर्ज स्वरूपात अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्याच्या

विनंतीच्या अनुषंगाने हातमाग महामंडळाला कर्ज स्वरूपात  निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

"महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या.,नागपूर यांस कर्जे"या योजने अंतर्गत महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळास हातमाग विणकर सहकारी संस्थाना अदा करावयाच्या रक्कमेच्या अनुषंगाने रु.१,३९,२०,०००/- (रु. एक कोटी एकोणचाळीस लक्ष वीस हजार फक्त ) इतका निधी कर्ज स्वरुपात उपलब्ध करून देण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**सदर देयक सशर्त स्वरूपाचे आहे.**

२. सदर कर्जासाठी महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळास खालीलप्रमाणे अटी व शर्ती बंधनकारक राहतील.

अ) महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळास ज्या प्रयोजनार्थ कर्ज उपलब्ध करून देण्यात येत आहे त्या प्रयोजनावरच ते वापरण्यात यावे.

आ) सदर कर्जावर प्रचलीत नियमानुसार व्याज आकारण्याच्या व सदर कर्जाच्या परतफेडीसाठी लागू करावयाच्या कालावधीच्या अनुषंगाने वित्त विभागाचे अभिप्राय प्राप्त करून घेण्यात येतील व त्याप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

इ) उपरोक्त (आ) मधील शासन निर्णय निर्गमीत झाल्यानंतर सदर शासन निर्णयानुसार लागू करण्यात आलेल्या नियम,सुचना,अटी व शर्ती यांचे महामंडळाने काटेकोरपणे पालन करणे बंधनकारक राहील.

३. उपरोक्त रक्कम रु.१,३९,२०,०००/-(रु. एक कोटी एकोणचाळीस लक्ष वीस हजार फक्त ) "महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर " (MAHARASHTRA STATE HANDLOOMS CORPORATION LTD., NAGPUR) यांना RTGS द्वारे वितरीत करण्यात यावी. बँक खात्याचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

State Bank of India, Ravi Nagar Branch, Nagpur
Account No. ३००१९८०५४४६ (Current Account)
IFSC Code SBIN००१२९५७
MICR Code ४४०००२०४४

४. सदर रक्कम रु.१,३९,२०,०००/- (रु. एक कोटी एकोणचाळीस लक्ष वीस हजार फक्त)  अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन हातमाग महामंडळाला वितरीत करण्यासाठी श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि श्रीम.श्रध्दा कोचरेकर, उपसचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. यासाठी होणारा खर्च रु.१,३९,२०,०००/- (रु. एक कोटी एकोणचाळीस लक्ष वीस हजार फक्त ) पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२४-२५ करीता मंजुर रूपये २००.०० लक्ष इतक्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

"मागणी क्र. व्ही-५, ६८६०- ग्राहकोपयोगी उद्योगांसाठी कर्ज,०१ वस्त्रोद्योग,१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे, (०२)कर्जे योजना,(०२)(०४),महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या.,नागपूर यांस कर्जे(कार्यक्रम)(६८६०००९३), ५५ कर्जे व आगाऊ रक्कमा "

६. सदर कर्जाच्या परतफेडीकरीता पुढील लेखाशिर्षाखाली मुद्दल व व्याजासह रक्कम जमा करण्यात यावी.

"मागणी क्र. व्ही-५,६८६०,ग्राहकोपयोगी उद्योगांसाठी कर्जे,०१-वस्त्रोद्योग,१९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे,(०२) कर्जे योजना,(०२)(०१),महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या.,नागपूर यांस कर्जे मुख्य लेखाशीर्ष (६८६०५०३२)"

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौ.सं.१२६/२०२५/व्यय-२, दि.०४.०३.२०२५ रोजी दिलेल्या वित्त विभागाच्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१७२८०४८६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PATHAN ANJUM BANO RASHIDKHAN

Digitally signed by PATHAN ANJUM BANO RASHIDKHAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=c6a8800841f0173430c13770d9d86bc16cf387b050d3c5c9ebcedbbd3dcf07f3,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D0F333CC391EF2D7D49DC6FD87E92EB9303FC9A19FD00938A0D8AE79AD2EB1F7, cn=PATHAN ANJUM BANO RASHIDKHAN
Date: 2025.03.28 17:28:55 +05'30'

**(अंजुम पठाण)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
३) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त वस्त्रोद्योग,वस्त्रोद्योग आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य नागपूर .
८) उपसचिव (टेक्स ३), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) उपसचिव (अर्थसंकल्प-१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर.
११) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१३) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१५) सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नविन प्रशासकीय इमारत, मुंबई
१६) कोषागार अधिकारी, नागपूर.
१७) प्रादेशिक उपायुक्त (वस्त्रोद्योग ) सर्व.
१८) निवड नस्ती (टेक्स ३ ).